महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था,मुंबई आणि प्रादेशिक कामगार संस्था, नागपूर येथील अधिकाऱ्याचे /कर्मचाऱ्याचे गोपनीय अहवाल प्रतिवेदित / पुनर्विलोकीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

उद्योग,उर्जा व कामगार विभाग
शासन निर्णय क्रमांक:एमएलआय-१२१८/प्र.क्र.३४/कामगार-६
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक- ०६ डिसेंबर, २०१८.

वाचा:- शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र. एमएलआय-२०१६ /प्र.क्र. ३४९/ काम-६ , दि. २१.०९.२००६.

**प्रस्तावना:-**

उपरोक्त संदर्भाधीन दि. २१.०९.२००६ रोजीच्या शासन निर्णयान्वये कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था,मुंबई आणि प्रादेशिक कामगार संस्था,नागपूर या कार्यालयातील अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे गोपनीय अहवाल प्रतिवेदित करणे/ पुनर्विलोकित करणे यासंदर्भात मार्गदर्शक सुचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. तथापि, सद्यस्थितीत संचालक, कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था,मुंबई या पदावर कामगार उप आयुक्त दर्जाचे अधिकारी कार्यरत आहेत. यास्तव उपरोक्त दोन्ही कार्यालयातील अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे गोपनीय अहवाल प्रतिवेदित / पुनर्विलोकित करण्याच्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय:-**

कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था,मुंबई व प्रादेशिक कामगार संस्था, नागपूर या कार्यालयातील प्राध्यापक / अधिव्याख्याता / संशोधन अधिकारी / प्रबंधक व उप संचालक या पदावरील अधिकाऱ्यांचे सन २०१७-२०१८ या वर्षाचे गोपनीय अहवाल तसेच संचालक, कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था,मुंबई या पदावर नियमित अधिकाऱ्याची नियुक्ती होईपर्यंतच्या कालावधीसाठी संबंधित अधिकाऱ्यांचे गोपनीय अहवाल पुर्नविलोकित करण्यासाठी पुनर्विलोकन अधिकारी म्हणून उप सचिव (कामगार) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदरहू विषयासंदर्भातील यापुर्वीच्या शासन निर्णय दि. २१.०९.२००६ मधील उर्वरित तरतुदी पुर्वीप्रमाणेच लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्या संकेताक २०१८१२०६१४४२३५९७१० असा आहे. सदरचा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhir Govindrao Sugaonkar

Digitally signed by Sudhir Govindrao Sugaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f108fb5ef03e8283a578fa5070c7cb09619c46836c847e6978830f509fe2c0ee, cn=Sudhir Govindrao Sugaonkar
Date: 2018.12.06 14:46:15 +05'30'

**( सुधीर सुगांवकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था,मुंबई
२. उप संचालक,प्रादेशिक कामगार संस्था,नागपूर.
३. प्रबंधक, कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था,मुंबई
४. प्रधान सचिव (कामगार) ,उद्योग ,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
५. उपसचिव (कामगार) ,उद्योग ,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
६. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
७. निवड नस्ती (कामगार-६).